**राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा कार्यक्रम** (ISSNIP-World Bank) **पदाच्या कार्यभाराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.६९/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७

वाचा : - १) महिला व बाल विकास विभाग कार्यालयीन आदेश क्र एबावि- २०१४/प्र.क्र.६९/का.६, दिनांक १० एप्रिल २०१४

२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.६८/का.६, दिनांक ३० एप्रिल २०१४

३) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.१०-१/२०१३-WBP,दिनांक १८ मार्च २०१६

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेली एकात्मिक बालविकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेची राज्यातील २० जिल्हयात ३१७ प्रकल्पात एकुण ६०१३२ अंगणवाडी केंद्रात अंमलबजावणी सुरु करण्यास दिनांक ३० एप्रिल २०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकण व पोषण सुधारणा प्रकल्पाची पुनर्रचना मार्च-२०१६ मध्ये केलेली आहे. त्यानुसार पुर्वी केंद्र हिस्सा ९०% व राज्य हिस्सा १०% असे निधीचे प्रमाण होते. त्यामध्ये बदल करुन केंद्र हिस्सा ८८% व राज्य हिस्सा १२% असे निधीचे प्रमाण करण्यात आलेले आहे. केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १८/०३/२०१६ च्या पत्रान्वये एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा (ISSNIP-World Bank) कार्यक्रमाअंतर्गत ICT-RTM (Information Communication Technology Enable Real-time Monitoring) ची अंमलबजावणी तसेच DLI-१, DLI-२, व DLI-३, व DLI-४ हे उपक्रम (मोबाईल व्दारे मुलांचा डाटा संकलित करणे, प्रशिक्षण साहित्य छपाई, अन्नप्राशन व ओटीभरण) हे कार्यक्रम राज्यात राबविण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

२. राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बालविकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या पदाचा कार्यभार दिनांक १० एप्रिल २०१४ च्या कार्यालयीन आदेशान्वये प्रधान सचिव (महिला व बाल विकास) यांच्याकडे तात्पुरत्या स्वरुपात ठेवण्यात आलेला होता. राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प कार्यालयाचे कामकाज नवी मुंबई येथुन हाताळण्यात येत आहे. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई ही दोन्ही कार्यालये एकाच ठिकाणी कार्यरत असल्यामुळे राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प पदाचा कार्यभार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्याकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य प्रकल्प संचालक, जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प कार्यालयाचे कामकाज नवी मुंबई येथुन हाताळण्यात येत आहे.

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई ही दोन्ही कार्यालये एकाच ठिकाणी कार्यरत असल्यामुळे राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या पदाचा कार्यभार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्याकडे **दिनांक १ सप्टेंबर, २०१७** पासून सोपविण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८३११३३१२१७३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinita Vaid Singal

Digitally signed by Vinita Vaid Singal
DN: c=IN, o=Commissionerate Integrated Child Development Service Scheme, ou=Women And Child Development of Department, postalCode=400614, st=Maharashtra, 2.5.4.20=df64f63ee52f1faf8b406f825c358391702d61c47fee432e9106486eb53c4867, serialNumber=a1d52427a2acd827d0c5733431ed650d5cae8020c5730ba60883661c3be91486, cn=Vinita Vaid Singal
Date: 2017.08.31 16:08:14 +05'30'

**(विनिता वेद सिंगल)**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) राज्य प्रकल्प संचालक,जागतिक बँक प्रकल्प,एकात्मिक बाल विकास सेवायोजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प,नवी मुंबई
५) सर्व जिल्हाधिकारी
६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग.
८) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद)
९) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी प्रकल्प)
१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
१३) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५) उप सचिव (श्री गुजर/श्रीमती निवतकर), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) वित्त विभाग, (व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती (कार्यासन ६)